**मौजे भोर वन वसाहतीभोवती आर.सी.सी. (R.C.C.) गटारसह संरक्षक भिंत नवीन बांधकामचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.वनबां-२०१८/प्र.क्र.०७/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- ०२ नोव्हेंबर, २०१८**

वाचा:- अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/वअं/लेखा(३)/प्र.क्र.१३५/८४७/२०१७-१८, दिनांक १९.१२.२०१७

**प्रस्तावना:-**

उपविभागीय वन अधिकारी, भोर यांचे वनपरिक्षेत्रातील मौजे भोर वन वसाहतीभोवती आर.सी.सी. (R.C.C.) गटारसह संरक्षक भिंत नवीन बांधकाम अंदाजपत्रक उप वन अभियंता, पुणे विभाग, पुणे यांनी तयार केले आहे व उपविभागीय वन अधिकारी, भोर उप विभाग, भोर व कनिष्ठ अभियंता, वन अभियंता यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी साक्षांकित केले आहे. तसेच वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्याकामाचे रू.४०.०० लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे.

संदर्भाधिन पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने अंदाजपत्रकाचे छाननीअंती उपविभागीय वन अधिकारी, भोर यांचे वनपरिक्षेत्रातील मौजे भोर वन वसाहतीभोवती आर.सी.सी. (R.C.C.) गटारसह संरक्षक भिंत नवीन बांधकामाच्या रू.४०.०० लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने सदरचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून भागवावा या अटीच्या अधिन राहून सहमती दिलेली आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपविभागीय वन अधिकारी, भोर यांचे वनपरिक्षेत्रातील मौजे भोर वन वसाहतीभोवती आर.सी.सी. (R.C.C.) गटारसह संरक्षक भिंत नवीन बांधकामासाठी रू.४०.०० लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस व सोबत जोडलेल्या “प्रपत्र-अ” मध्ये नमूद केल्याप्रमाणे आणि सदरचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून भागवावा या अटीच्या अधिन राहून तसेच खालील अटींच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

१. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
५. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
६. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०३११२७२८२७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.11.03 11:48:24 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) पुणे
४. उप विभागीय वन अधिकारी, भोर
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

**“प्रपत्र-अ”**

**शासन निर्णय क्र.वनबां-२०१८/प्र.क्र.०७/फ-९, दिनांक ०२ नोव्हेंबर, २०१८ सोबतचे प्रपत्र-अ**

NAME OF WORK :- CONSTRUCTION OF NALLA R.C.C. GUTTER WITH COMPUND WALL AROUND FOREST COLONY AT BHOR IN BHOR RANGE OF BHOR SUB-DIVISION

RECAPUTILATION SHEET

| | | |
|---|---|---|
| **(A)** | Subestimate 1 | |
| | The estimate provides for the Construction of R.C.C. Gutter with R.C.C.Compound Wall around Forest Colony at Bhor in Bhor Range of Bhor Sub-Division | 27,07,503.00 |
| (B) | Subestimate 2 | |
| | The estimate provides for the Construction of R.C.C.Compound Wall around Forest Colony at Bhor in Bhor Range of Bhor Sub-Division | 6,78,039.00 |
| | Total (A+B) | 33,85,542.00 |
| (C) | Quality control Charges (Subestimate 1 and 2) | 34,950.00 |
| (D) | Additional Royalty Charges | 34,982.00 |
| | Work Total Rs. | 34,55,474.00 |
| | Add 4% Contingencies Charges | 1,38,219.00 |
| | Add 12% GST on (A + B) | 4,06,265.00 |
| | **Total Amount :-** | **39,99,958.00** |
| | **Say Rs.** | **40,00,000.00** |

*****************